शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मधील प्रिंटर टोनर रिसायकलिंगकरिता खाजगी पुरवठादाराची नियुक्ती करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : खरेदी-२०२१/प्र.क्र.२५/नोंदणी शाखा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक : २९ डिसेंबर, २०२१**

संदर्भ : १. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/-भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६

२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/-उद्योग-४, दिनांक २४ डिसेंबर, २०१७

३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०२१/प्र.क्र.८/-उद्योग-४, दिनांक ७ मे, २०२१

४. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची क्रमांक : खरेदी-२०२१/प्र.क्र.२५/नोंदणी शाखा, दिनांक २९ नोव्हेंबर, २०२१ रोजीची दरपत्रक सूचना

**शासन आदेश :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मधील प्रिंटर टोनर रिसायकलिंगकरिता खाजगी पुरवठादारासोबत एक वर्षाचा करार करण्याकरिता दिनांक २९ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या सूचनेद्वारे दरकरार मागविण्यात आले होते. प्राप्त झालेल्या १० दरकरारांपैकी ५ निविदा पात्र ठरल्या. सदर ५ दरकरारापैकी प्रिंटर टोनर रिसायकलिंगचे न्यूनतम दर सादर करणारे ३ पुरवठादार पुढीलप्रमाणे आहेत-

| | LISTA & COMPANY | ZUM ZUM ENTERPRISES | APEX ENTERPRISES |
|---|---|---|---|
| SAMSUNG 116 | 188.00 | 339.00 | 525.10 |
| BROTHER 021 | 110.00 | 370.00 | 395.30 |
| HP 2612 A | 169.00 | 339.00 | 395.30 |
| HP 28 A | 229.00 | 339.00 | 501.50 |
| HP 88 A | 169.00 | 339.00 | 395.30 |
| HP 78 A | 198.00 | 339.00 | 395.30 |
| RICO 310 | 245.00 | 370.00 | 885.00 |
| RICO 3410 | 245.00 | 370.00 | 885.00 |
| CANON 337 | 178.00 | 339.00 | 436.60 |

लिस्टा ॲण्ड कंपनीचे दर सर्वात कमी असल्याने, दिनांक १६ डिसेंबर, २०२१ रोजी झालेल्या खरेदी समितीच्या बैठकीत लिस्टा ॲण्ड कंपनी, तळ मजला, क्रमांक ७, २८८ इंजिनियरिंग इमारत, एस. बी. एस. रोड, बेलार्ड इस्टेट, मुंबई- ४०० ०३८ यांची खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून निवड करण्यात आली आहे-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (खुद्द) मधील प्रिंटर टोनर रिसायकलिंग करण्याचा कालावधी प्रथमत: दिनांक १.०१.२०२२ ते दिनांक ३१.०१.२०२२ इतका राहील

२. लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई यांना सदर १ महिन्याच्या कालावधीत प्रिंटर टोनर रिसायकलिंगचे काम समाधानकारक दिल्यास त्यांचा पुढील एक महिन्यासाठी प्रिंटर टोनर रिसायकलिंगचा करार सुरू ठेवण्यात यावा. याप्रमाणे प्रत्येक वेळेस एक महिन्याकरीता यानुसार कमाल १ वर्षाकरीता करार करण्यात येईल.

३. विभागाच्या आवश्यकतेनुसार वस्तूंची मागणी करण्यात येईल व मागणी केल्यावर सदर वस्तू निश्चित केलेल्या दराने व दर्जानुसार पुरवठा करणे बंधनकारक राहील. पुरवठादाराकडून पुरविण्यात येणाऱ्या वस्तुंच्या दर्जात अथवा किंमतीत पुरवठादाराने कोणताही बदल केल्यास, सदर वस्तू नाकारणे तसेच करारनाम्याचे पालन समाधानकारक न झाल्यास करारनामा संपुष्टात आणण्याबाबत विभागाचा निर्णय अंतिम राहील.

४. रिसायकलिंग केल्यानंतर येणारी प्रिंट स्वच्छ व सुस्पष्ट आली पाहिजे. काळी शाई पसरता कामा नये. त्यासाठी सर्व आवश्यक ती उपाययोजना पुरवठादाराने करावी व योग्य ती खबरदारी घ्यावी. तसे न केल्यास, तसेच, रिसायकलींग केल्यानंतर येणाऱ्या प्रिंटची संख्या निर्धारित केलेल्या प्रिंटच्या संख्येपेक्षा कमी येत असल्याचे तक्रार प्राप्त झाल्यास अथवा तसे निदर्शनास आल्यास पुरवठादारास नोटीस देण्यात येईल.

५. उक्त (४) मध्ये नमूद परिस्थितीत नोटीस दिल्यानंतर, प्राप्त तक्रारीबाबत १५ दिवसात तक्रार निवारण न झाल्यास सदर करार संपुष्टात आणण्यात येईल. तसेच पुरवठादाराने प्राप्त तक्रारीबाबत १५ दिवसात निवारण केल्यास, करार पुढे सुरू राहील. तथापि, वारंवार तक्रारी प्राप्त होत राहिल्यास व त्यांचे वेळीच निराकरण न झाल्यास पुरवठादारास १५ दिवसाची नोटीस देऊन करार संपुष्टात आणण्यात येईल.

६. उक्त परिस्थितीत, करार कालावधीत (जास्तीत जास्त दिनांक ३१ डिसेंबर, २०२२ पर्यंत) अथवा मुदतवाढ कालावधीत अथवा नवीन करार अंमलात येईपर्यंत, टोनर रिसायकलिंग काम सुरू राहणे आवश्यक असल्याने, प्राप्त झालेल्या निविदेमधून न्यूनतम किंमतीचे दर सादर करणाऱ्या दुसऱ्या क्रमांकाच्या पुरवठादारास टोनर रिसायकलिंगचे काम देण्यात येईल व त्यांना सर्व अटी व शर्ती या करारानुसारच लागू राहतील.

७. पुरवठादाराची सेवा समाधानकारक असल्यास व निर्धारित किंमतीत पुरवठादार सेवा देण्यास तयार असल्यास, निवड केलेल्या पुरवठादारास मुदतवाढ देण्याबाबत निर्णय घेण्यात येईल. तसेच, मुदतीनंतर नवीन करारनामा होईपर्यंत टोनर रिसायकलिंगची सेवा मागणीनुसार पुरवणे पुरवठादारास बंधनकारक असेल.

८. करार कालावधीमध्ये नमूद केलेल्या कंपनीव्यतिरिक्त इतर कंपनीचे अथवा क्रमांकाचे प्रिंटरचे टोनर रिसायकलिंग करावयाचे झाल्यास ते रास्त किंमतीत तातडीने रिसायकलिंग करून देणे पुरवठादारास बंधनकारक राहील.

२. या संदर्भात लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई या संस्थेसोबत १०० रुपयांच्या मुद्रांक कागदावर (Stamp paper) करारनामा करण्यात यावा.

३. हा शासन आदेश, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग एक, उपविभाग दोन, अनुक्रमांक १, नियम २ व ७ अन्वये मंजूरी देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक ३० ऑक्टोबर, २०१५ व दिनांक ७ मे, २०२१ मधील विहित अटी व शर्तींचे पालन करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२११२२९१७५२४५४२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.12.29 17:53:17 +05'30'

**(स्वाती नानल)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सर्व सह सचिव / उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई
५. लिस्टा ॲण्ड कंपनी, तळ मजला, क्रमांक ७, २८८ इंजिनियरिंग इमारत, एस. बी. एस. रोड, बेलार्ड इस्टेट, मुंबई- ४०० ०३८
६. निवड नस्ती / नोंदणी शाखा